जिल्हाधिकारी, अमरावती यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवर अपर जिल्हाधिकारी यांचे एक अधिसंख्य पद निर्माण करणेबाबत ...

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक:- ईएसटी-२०१६/प्र.क्र.१३७/ई-८**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ०८/०२/२०१९.

**संदर्भ**:- १) रिट याचिका क्र.५५/२००४ च्या अनुषंगाने मा. मुंबई उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर उच्च न्यायालय, खंडपीठ नागपूर यांचे आदेश दि. ०९/०३/२०१६
२) शासन आदेश महसूल व वन विभाग क्र. डीपीटी २०१६/ ०३/प्र.क्र.५९/ई-१ दि. १७/०३/२०१६
३) मा. मुंबई उच्च न्यायालय,खंडपीठ नागपूर यांच्याकडील सिव्हील ॲप्लीकेशन (सिएडब्ल्यु) क्र. ८५८/२०१६ इन रिट याचिका क्र. ५५/२००४ यामधील आदेश दिनांक २१/६/२०१६
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग, क्र ईएसटी-२०१६/प्र.क्र.१३७/ई-८, दि.२६/१०/२०१६

**प्रस्तावना:-**

श्री. एस. जी. गौतम, अपर जिल्हाधिकारी यांच्या संदर्भात श्री. सुनील शिंदे यांनी महाराष्ट्र शासनाच्या विरुद्ध मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपुर खंडपीठासमोर जनहित याचिका क्रमांक ५५/२००४ ची दाखल केली होती. सदर याचिकेवर दि.०९/०३/२०१६ रोजी झालेल्या सुनावणीत पुढील आदेश होईपर्यंत श्री. गौतम यांच्याकडे कोणत्याही पदाचा कार्यभार देण्यात येऊ नये, असे आदेश मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या नागपूर खंडपीठाने दिले होते. श्री. गौतम यांनी या आदेशासंदर्भात मा. उच्च न्यायालय,मुंबई खंडपीठ, औरंगाबाद येथे दाखल केलेल्या याचिकेवर दि.२२.०६.२०१६ रोजी मा. उच्च न्यायालयाने श्री. गौतम यांना त्यांच्या थकीत वेतनाची रक्कम १५ दिवसात अदा करण्याबाबत आदेश दिले होते. या आदेशांस अनुसरुन दि.२६/१०/२०१६ च्या शासन निर्णयान्वये जिल्हाधिकारी, अमरावती यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवर दि.०१/०७/२०१६ ते दि.३१/१२/२०१६ या कालावधीसाठी किंवा मा.उच्च न्यायालयाचे संदर्भाधिन रिट याचिकेच्या अनुषंगाने पुढील आदेश पारित होईपर्यंत यापैकी जे आधी असेल त्या कालावधीसाठी एक अधिसंख्य पद निर्माण करण्यात आले होते.

२. मा. उच्च न्यायालयाने श्री. गौतम यांना कोणत्याही पदाचा कार्यभार न देण्याचे आदेश पारित केले असल्याने त्यांना संवर्ग पदावर पदस्थापना देता आलेली नाही. श्री. गौतम अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) हे दि. ३१/८/२०१८ रोजी सेवानिवृत्त झाले असल्याने त्यांना दि.०१/०१/२०१७ ते दि.३१/८/२०१८ या कालावधीचे वेतन अदा करणे आवश्यक आहे.

जिल्हाधिकारी अमरावती यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवर अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील रु.३७४००-६७०००/-, ग्रेड पे ८७०० या वेतनश्रेणीत दि.०१/०१/२०१७ ते दि.३१/८/२०१८ या कालावधीसाठी एक अधिसंख्य पद निर्माण करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

श्री. गौतम अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) हे दि. ३१/८/२०१८ रोजी सेवानिवृत्त झाले असल्याने त्यांना दि.०१/०१/२०१७ ते दि.३१/८/२०१८ पर्यंत वेतन अदा करणे आवश्यक आहे. जिल्हाधिकारी अमरावती यांच्या कार्यालयाच्या आस्थापनेवर अपर जिल्हाधिकारी (निवडश्रेणी) संवर्गातील रु.३७४००-६७०००/-, ग्रेड पे ८७०० या वेतनश्रेणीत दि.०१/०१/२०१७ ते दि.३१/८/२०१८ या कालावधीसाठी एक अधिसंख्य पद निर्माण करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय वित्त विभाग अनौपचारीक संदर्भ क्र. ४९२/१८ आपुक दिनांक २१/१२/२०१८ नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१९०२१११५३८५३७३१९ असा आहे. उक्त शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Digitally signed by Ajit Sopanrao Deshmukh
Date: 2019.02.11 15:51:10 +05'30'

**( अजित देशमुख )**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) विभागीय आयुक्त, अमरावती विभाग, अमरावती.
२) जिल्हाधिकारी, अमरावती .
३) जिल्हा कोषागार अधिकारी, अमरावती.
४) प्रधान महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा), महाराष्ट्र - २, नागपूर
५) उप सचिव (आपुक) वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.
६) उप सचिव (कार्यासन ब-१/ई-१) महसूल व वन विभाग, मंत्रालय,मुंबई - ३२.
७) निवड नस्ती, कार्यासन ई-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२.